**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय,नाशिक येथे प्रथम वर्ष एम. बी. बी. एस. अभ्यासक्रमाकरिता ५० विद्यार्थी प्रवेशास परवानगी देण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय क्रमांक: एमईडी-२०२०/प्र.क्र.२१/२०/शिक्षण-१

९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

दिनांक:-२१.०८.२०२४

**वाचा**:- १) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र.एमईडी-२०२०/प्र.क्र.२१/२०/शिक्षण-१, दिनांक ०५.०४.२०२१.

२) राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.N-22011/116/2024-Assessment Cell/MARB (8279920), दिनांक १६.०८.२०२४.

**प्रस्तावना:-**

नाशिक येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय केंद्र शासनाच्या मान्यतेनंतर सुरू करण्यास संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात आली आहे. दरम्यानच्या कालावधीत राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली अंतर्गत मेडिकल असेसमेंट अँड रेटींग बोर्ड (MARB) यांनी उपलब्ध सोई- सुविधांच्या आधारे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या वैद्यकीय महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी संदर्भ क्र. (२) येथील पत्रान्वये ५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसाठी विशिष्ट अटींच्या अधीन राहून परवानगी दिली आहे. सबब, सदर महाविद्यालयास एमबीबीएस अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी ५० विद्यार्थी प्रवेश क्षमतेसह परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली अंतर्गत मेडिकल असेसमेंट अँड रेटींग बोर्ड (MARB) यांनी संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या संस्थेस शैक्षणिक वर्ष २०२४-२५ साठी एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता ५० विद्यार्थी प्रवेशित करण्यासाठी पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती:-**

१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नाशिक या वैद्यकीय महाविद्यालयातील एम.बी.बी.एस. अभ्यासक्रमाच्या प्रथम वर्षाकरिता विद्यार्थी प्रवेश क्षमता केंद्र शासनाने निर्धारित केल्यानुसार ५० इतकी राहील.

२) सदर अभ्यासक्रमास महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे संलग्निकरण प्राप्त करुन घेण्यात यावे व तद्नंतर विद्यार्थी प्रवेशित करण्यात यावेत.

३) राज्य शासन/केंद्र शासन/मा.सर्वोच्च न्यायालय अथवा मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

४) केंद्र शासन, राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली व राज्य शासन यांनी वैद्यकीय अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे बंधनकारक राहील.

५) कोणत्याही परिस्थितीत राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेशीत करू नयेत.

६) केंद्र शासनाने दिलेली परवानगी ही सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाकरिता असून तद्नंतर सदर परवानगीचे दरवर्षी नूतनीकरण करुन घेणे क्रमप्राप्त आहे. त्यानुसार पुढील शैक्षणिक वर्षात नव्याने विद्यार्थी प्रवेशित करण्यापूर्वी केंद्र शासनाच्या तसेच त्याआधारे राज्य शासनाच्या परवानगीचे नूतनीकरण करुन घेणे बंधनकारक राहील.

७) सदर शासन निर्णय हा राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्रमांक (२) येथील पत्रान्वये दिलेली परवानगी तसेच महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ नुसार शासनास प्रदत्त अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२११२००३६९२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2024.08.21 15:59:04 +05'30'

(अजित सासुलकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई

३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
९. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई.
१२. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
१३. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१४. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१५. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, गोकूळदास तेजपाल रूग्णालय परिसर, मुंबई.
१६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१७. जिल्हा शल्यचिकित्सक, नाशिक.
१८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
१९. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये.
२०. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ९ वा मजला, न्य एक्सेलसिअर बिल्डींग, ए.के. नायक मार्ग, फोर्ट, मुंबई
२१. सर्व सह /उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती (शिक्षण-१).